**वृत्तपत्रात द्यावयाच्या जाहिरातीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक** क्र. झेडपीए २००५/प्र.क्र ३६६/वित्त-९,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ५ फेब्रुवारी,२००८

**वाचा :-१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय** , क्रमांक : झेडपीए १०८९/प्र.क्र १०१४/वित्त-९, दिनांक: २५/२/१९९०

२) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय,** क्रमांक :पीयूबी-१०००/प्र.क्र ७३/२०००/३४, दिनांक १ मे, २००१,

३) **ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक** क्रमांक: झेडपीए २००५/प्र.क्र ३१५/वित्त-९, दिनांक: २४/११/२००५

४) **ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक** क्रमांक: झेडपीए २००६/प्र.क्र ३६६ / वित्त-९, दिनांक: ३०/१२/२००६

**प्रस्तावना:-**

जिल्हा परिषदांकडून विविध कामकाजासंदर्भात जाहिराती दिल्या जातात. जाहिराती देण्याबाबत **महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखा संहिता नियम, क्रमांक १३८(१) व (६) (ब )** मध्ये तरतुद करण्यात आली आहे. तथापि जिल्हा परिषदांमार्फत देण्यात येणाऱ्या जाहिराती वेगवेगळया स्तरावर फक्त मराठी व इंग्रजी दैनिक वर्तमान पत्रातूनच देण्यात येत होत्या. यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भित अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयामधील तरतुदीनुसार हिंदी दैनिक वर्तमान पत्रातूनही जाहिराती देण्याचा प्रस्तावावर या विभागाने दिनांक ३०/१२/२००६रोजी शासन निर्णय निर्गमित केलेला आहे.

परंतु प्रस्तुत शासन निर्णयामध्ये सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १मे,२००१च्या शासन निर्णयातील विभागीय स्तर दिलेले नसल्याने याबाबत सूचना निर्गमित करण्याबाबत जिल्हा परिषदा व स्थानिक लोकप्रतिनिधींकडून मागणी करण्यात आलेली असल्याने , उक्त शासन निर्णय अधिक्रमित करून यासंदर्भात नव्याने सूचना निर्गमित करणे आवश्यक आहे. यास्तव आता या विभागाचा दिनांक ३०/१२/२००६ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून त्याऐवजी या शासन निर्णयान्वये नव्याने खालील सूचना देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक :-** महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखा संहितेच्या नियम क्रमांक १३८(६) (ब ) मध्ये खालील प्रमाणे तरतुद आहे.

| कामाची रक्कम | ज्या वर्तमानपत्रात जाहिरात दयावयाच्या ती वृत्तपत्रे |
|---|---|
| १) रु. ५ लाखापेक्षा कमी खर्चाची कामे. | जिल्हा स्तरावर ~~मराठी/हिंदी~~ |
| २) रु. ५ लाख ते ५० लाखापर्यंतची खर्चाची कामे. | राज्य स्तरावर -- मराठी /हिंदी<br>जिल्हा स्तरावर -- मराठी /हिंदी |
| ३) रु. ५० लाख व त्यापेक्षा जास्त खर्चाची कामे. | ~~राज्य स्तरावर~~ -- मराठी /इंग्रजी. /हिंदी |

उपरोक्त तरतुदींमध्ये अंशतः सुधारणा करण्यात येत आहे. शासन मान्यता प्राप्त दैनिक वर्तमान पत्रामध्ये द्यावयाच्या जिल्हा परिषदेच्या जाहिराती हया, पुर्वी फक्त दैनिक वर्तमानपत्रातच दिल्या जात होत्या. परंतु आतां जिल्हा परिषदेच्या सर्व जाहिराती हया खालील कोष्टकात दर्शविल्याप्रमाणे देण्याबाबत या आदेशान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

| | एका कामाचे मूल्य | जाहिरात वितरण करण्याचे अधिकार | जाहिरात प्रसिद्धीचे वृत्तपत्र | |
|---|---|---|---|---|
| १ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु. ५ लाखापेक्षा कमी आहे अशी कमी खर्चाची कामे. | जिल्हा माहिती अधिकारी | जिल्हा स्तरावरील | एक "क" वर्ग दैनिक (मराठी /हिंदी)<br>व एक "क" वर्ग मराठी साप्ताहिक |
| २ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु. ५ लाखाच्यावर ते ५० लाखापर्यंत आहे. अशी खर्चाची कामे | विभागीय माहिती उपसंचालक | १) जिल्हा स्तरावरील<br>२) विभागीय स्तरावरील | १) एक "ब" वर्ग दैनिक (मराठी /हिंदी)<br>२) एक "ब" वर्ग दैनिक (मराठी /हिंदी)<br>एक "ब" वर्ग मराठी साप्ताहिक |
| ३ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु. ५०,००,००१ पेक्षा अधिक आहे. अशी खर्चाची कामे | मुख्यालय | १)राज्यस्तरावरील<br>२)संबंधित विभागातील<br>३) ज्या जिल्हयाचे काम असेल त्या जिल्हयातील | १)"अ" वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी /हिंदी)<br>२)"ब" वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी / हिंदी)<br>३) एका "क" वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी / हिंदी) आळीपाळीने त्या वर्गातील वृत्तपत्रांचे से.मी. चे प्रमाण |



A:

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | लक्षात घेऊन जाहिरात वितरण करण्यात येईल. एक " अ" व एक "ब" ८ मराठी साप्ताहिक |

उपरोक्त कोष्टकामध्ये दर्शविण्यात आलेली दैनिकांची साप्ताहिकांची वर्गवारी ही खालील कोष्टकावरून ठरविण्यात यावी.

| अ.क्र | वृत्तपत्राचा वर्ग | किमान व कमाल खपाचा निकष |
|---|---|---|
| १ | क वर्ग दैनिके | (१) जिल्हा व त्याखालील स्तरावरुन प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप २००१ ते २०,००० प्रती एवढा असणे आवश्यक.<br>(२) विभागीय मुख्यालयांच्या ठिकाणांहून प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप ३००१ ते २०,०००प्रती एवढा असणे आवश्यक.<br>(३) मुंबईतून प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप ५००१ ते २०,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक. |
| २ | ब वर्ग दैनिके | ब वर्ग दैनिके किमान खप २०,००१ ते ५०,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक आहे. |
| ३ | अ वर्ग दैनिके | अ वर्ग दैनिके किमान खप ५०,००१ प्रतींपेक्षा अधिक |

ब- साप्ताहिके :-

| | | |
|---|---|---|
| १ | क वर्ग साप्ताहिके | किमान खप १००१ ते १०,००० प्रतीं एवढा आवश्यक |
| २ | ब वर्ग साप्ताहिके | किमान खप १०,००१ ते २५,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक |
| ३ | अ वर्ग साप्ताहिके | किमान खप २५,००१ प्रतीं पेक्षा अधिक असणे आवश्यक. |

याप्रमाणे सुधारणा व बदल महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या लेखा संहिता १९६८ मध्ये यथावकाश करण्यात येईल. तथापि जाहिराती संबंधीच्या यापूर्वी दिलेल्या आदेशामधील अन्य अटी व शर्ती तशाच अंमलात राहतील. 200908051227 2000

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(ना.रा. भागवत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

A: